माहितीचा अधिकार अधिनियम २००५ च्या प्रशिक्षणावरील खर्चाकरिता यशादा, पुणे या संस्थेस सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांक- GAD-12023/40/2024-GAD(DESK-6)**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक- ०२ ऑगस्ट, २०२४

**वाचा-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक- अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.लेखानु-२०२४/(प्र.क्र.१४/२०२४)/अर्थसं, दि.०१.०४.२०२४

३) संचालक, माहिती अधिकार केंद्र, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांचे प.क्र.सीआरटीआय/मा.अ.प्रशि/२०२४-२५, दि.२२.०५.२०२४.

**प्रस्तावना:-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेमार्फत राज्यातील जन माहिती अधिकारी / अपीलीय प्राधिकारी यांना माहितीचा अधिकार अधिनियम २००५ संदर्भात प्रशिक्षण देण्यात येते. "मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७०-इतर प्रशासनीक सेवा, ००-००३ प्रशिक्षण राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०९) माहितीचा अधिकार अधिनियमाच्या प्रशिक्षण निधीसाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदाने (२०७०-०८२-६) दत्तमत, ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली अनुदान दिले जाते. सन २०२४-२५ मध्ये या कामासाठी रू.१,८४,७३,०००/- (रु.एक कोटी चौऱ्याऐंशी लाख त्र्याहत्तर हजार फक्त) ची तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे.

तसेच शासन निर्णय, दिनांक ०४.०४.२०२४ नुसार अंतिम वितरणाचे आदेश प्राप्त होईपर्यंत अंतरिम वितरण आदेशानुसार प्रशासकीय विभागांस सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पिय प्रस्तावित लेखानुदानानुसार एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतचे खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे.

संचालक, यशदा, पुणे यांनी लेखानुदानाच्या मर्यादेत माहितीचा अधिकार प्रशिक्षण कार्यक्रमांसाठी सादर केलेला रु.५९,३७,६६४/- इतक्या रक्कमेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यासंदर्भात आता शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय –**

"मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७०-इतर प्रशासनीक सेवा, ००-००३ प्रशिक्षण राज्य योजनांतर्गत योजना, (००)(०९) माहितीचा अधिकार अधिनियमाच्या प्रशिक्षण निधीसाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदाने (२०७०-०८२-६) दत्तमत, ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रू.१,८४,७३,०००/- (रु.एक कोटी चौऱ्याऐंशी लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतक्या निधीपैकी लेखानुदानाच्या मर्यादेत एप्रिल, २०२४ ते जुलै, २०२४ या कालावधीकरीता रू.५९,३७,६६४/-(रु.एकोणसाठ लाख सदोतीस हजार सहाशे चौसष्ट फ़क्त) इतके सहाय्यक अनुदान संचालक, यशदा, पुणे यांना एकत्रितरित्या वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी "मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७०- इतर प्रशासनिक सेवा, ००-००३-प्रशिक्षण- राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०९) माहितीचा अधिकार अधिनियमाच्या प्रशिक्षण निधीसाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहायक अनुदाने (२०७०-०८२-६ ) दत्तमत, ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षातंर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असणा-या अनुदानापैकी आहे. त्यामुळे अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा व तो सन २०२४-२५ च्या खर्च खाती टाकण्यात यावा.

३. वितरीत करण्यात येणारी रक्कम रू.५९,३७,६६४/-(रु. एकोणसाठ लाख सदोतीस हजार सहाशे चौसष्ट फ़क्त) यशदा, पुणे कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी (संकेतांक क्र.२२०१ ०००१२१) यांनी आहरीत करावी. तसेच या निधीचा विनियोग वर दर्शविल्याप्रमाणे करुन, विनियोग प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापाल कार्यालयास तात्काळ सादर करण्याची कार्यवाही यशदाने करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.०४.२१५, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप-विभाग-एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०२१७१३२६२८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOVIND BHASKAR PAWAR

Digitally signed by GOVIND BHASKAR PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e50725cce3a4dbca1ff0b93de0fc66c6213931bf46e664186b931f73ce77f59a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E94393E3D129C252C23019C92DBF605A776527CA0D582055C5ED0AD6F66EE775, cn=GOVIND BHASKAR PAWAR
Date: 2024.08.02 17:28:52 +05'30'

**( गोविंद पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

संचालक, यशदा, पुणे ( २ प्रती ).
महालेखापाल ( लेखा परिक्षा )-१/२, महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर.
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग कार्यासन व्यय-४, अर्थसंकल्प-१४.
नियोजन विभाग (कार्यासन १४४३).
सल्लागार, माहिती अधिकार कक्ष, यशदा, पुणे.
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२५.
निवडनस्ती/ कार्यासन सहा.